**कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक या विद्यापीठाच्या संशोधक विद्यार्थी निवास व्यवस्थतेसाठी अतिथीगृहाच्या पहिल्या मजल्याच्या विस्तारीकरणाच्या बांधकामासाठी निधी वितरीत करणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. केएसयू-२०१९/प्र.क्र.०२/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४ जानेवारी, २०२२.

<u>पहा</u>:- १) शासन निर्णय क्र.केएसयू-२०१९/प्र.क्र.०२/विशि-२, दि.१२.०६.२०१९.
२) शासन निर्णय क्र.केएसयू-२०१९/प्र.क्र.०२/विशि-२, दि.१३.११.२०२१.
३) शासन निर्णय क्र.केएसयू-२०१९/प्र.क्र.०२/विशि-२, दि.२५.०३.२०२१.
४) कुलसचिव, कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक यांचे दि.११.११.२०२१ रोजीचे पत्र.

<u>प्रस्तावना</u> :

कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक येथील संशोधक विद्यार्थी निवास व्यवस्थेसाठी अतिथीगृहाच्या पहिल्या मजल्याच्या विस्तारीकरणाच्या बांधकामाबाबतचा इमारतींच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास संदर्भिय क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये रु.२०५.०७ लक्ष रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यासअनुसरुन संदर्भ क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये रु.३०.०० लक्ष व रु.७७.५० लक्ष असा एकूण रु.१०७.५० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता उर्वरित निधी वितरीत करण्याकरीता कुलसचिव, कवि कुलगरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने कवि कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक विद्यापीठाचा विकास (२२०२ ३४९५) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदींतून सदर कामाकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कवि कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक येथील विद्यापीठाचा विकास (कार्यक्रम) (२२०२ ३४९५) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाकरीता रु.१५०.०० लक्ष इतकी तरतूद मंजूर करण्यात आली आहे. संदर्भीय क्र.४ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने कवि कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक या विद्यापीठाच्या संशोधक विद्यार्थी निवास व्यवस्थेसाठी अतिथीगृहाच्या पहिल्या मजल्याच्या विस्तारीकरणाच्या बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता दिलेल्या रक्कमेपैकी आता उपलब्ध झालेल्या निधीतून **रु.९०,००,०००/- (अक्षरी रुपये नव्वद लक्ष फक्त)** इतकी तरतूद वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू वितरीत झालेला निधी कवि कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल - २ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता संबंधीत विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. संबंधीत विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilisation Certificate) तसेच विद्यापीठाने केलेल्या बांधकामाची सद्य:स्थिती संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास तात्काळ सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर खर्च "मागणी क्र. डब्ल्यु- ०२, मुख्य लेखाशीर्ष २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२ विद्यापीठांना सहाय्य, (००) (१४) कवि कालिदास संस्कृत विद्यापीठ, नागपूर विकास (कार्यक्रम) (२२०२ ३४९५) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ मधील मंजूर तरतूदीतून

खर्ची टाकण्यात यावा सदर अटींचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी कुलगुरु, कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक यांची राहील.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२१, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१ अन्वये विभागास अधिकार प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१११४/२०२१/व्यय-५, दि.०३.१२.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०१०५१११५२३६३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2022.01.05 11:16:54 +05'30'

(अ. म. बाविस्कर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. उप सचिव, मा. मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.(५ प्रती)
४. कुलगुरु, कवी कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक.
५. कुलसचिव, कवी कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक.
६. सहसंचालक (उच्च शिक्षण), नागपूर विभाग, नागपूर.
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
८. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२, महाराष्ट्र, नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ नागपूर.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ नागपूर.
११. कार्यासन अधिकारी (का-१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग,(व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मा.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१५. कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, उपरोक्त वितरीत करण्यात आलेला निधी तात्काळ BMS प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात यावा.
१६. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.